3

महाराष्ट्र राज्यातील संगणक व तदनुषंगिक बाबींची केंद्रीभूत खरेदी करणे, दर करार करणे तसेच सिस्टिम सॉफटवेअर,भाषा आज्ञावली व नेटवर्क संबंधी सर्व साहित्य खरेदी करण्यासाठी खरेदी समिती गठीत करणेबाबत ..

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक सीओएम२०००/प्र.क्र.४७/२००१/३९,
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक : २२ ऑक्टोबर,२००१

वाचा- १) शासन निर्णय,सा.प्र.वि.क्रमांक सीओएम १०९८/प्र.क्र.२१२/९८/९९,
दिनांक १० नोव्हेंबर,१९९८
२)शासन निर्णय,सा.प्र.वि.क्रमांक सीओएम २०००/प्र.क्र.४७/२००१/३९,
दिनांक ४ एप्रिल,२००१ व दिनांक २४ मे,२००१

**प्रस्तावना**

शासनाच्या संगणकीकरणाच्या धोरणास अनुलक्षून सर्व शासकीय कार्यालयांचे संगणकीकरण करण्याचा महत्वाकांक्षी कार्यक्रम शासनाने हाती घेतलेला आहे. संगणकीकरणासाठी लागणाऱ्या विविध तयार आज्ञावल्या खरेदी करण्यासाठी दि.१०.११.१९९८ च्या शासन निर्णयान्वये एक समिती गठित करण्यात आली होती. याशिवाय शासनाच्या विविध विभागांची निश्चित स्वरुपाची मागणी एकत्र करुन केंद्रीभूत पध्दतीने संगणक खरेदी केल्यास स्पर्धात्मक दर शासनास मिळण्यासाठी शासन निर्णय क्रमांक सीओएम २०००/प्रक्र४७/२००१/३९ दि.२४ मे,२००१ अन्वये संगणक खरेदी समितीची पुनर्रचना करण्यांत आली होती. संगणक खरेदीसाठी व तयार आज्ञावल्या खरेदीसाठी दोन वेगवेगळया समित्या कार्यान्वित न ठेवता महाराष्ट्र राज्यातील संगणक व तदनुषंगिक बाबींची केंद्रीभूत खरेदी करणे,दरकरार करणे तसेच सिस्टेम सॉफटवेअर, भाषा आज्ञावली व नेटवर्क संबंधी सर्व साहित्य खरेदी करण्यासाठी एकच खरेदी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

G2-2002 0422-161008 000-0104

**निर्णय**

संदर्भाधीन शासननिर्णयाचे अधिक्रमण करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलाआहे.-

१) शासनाच्या संगणकीकरणासाठी आवश्यक असे संगणक व तदनुषंगिक उपकरणे/बाबी खरेदी करणे,दरकरार करणे,भाषा आज्ञावली व नेटवर्कसंबंधित सर्व साहित्य खरेदी करणे याकरिता खालीलप्रमाणे खरेदी समिती गठित करण्यास शासन मान्यता देत आहे.

| | |
|---|---|
| १)सचिव,माहिती तंत्रज्ञान | - अध्यक्ष |
| २)सचिव(लेखा व कोषागारे),वित्त विभाग | - सदस्य |
| ३)श्री.जे.एस.साहनी,सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग | - सदस्य |
| ४)प्रभारी अधिकारी,राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र,मुंबई | - सदस्य |
| ५)विकास आयुक्त(उद्योग) | - सदस्य |
| ६) नियोजन विभागाचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ७) ज्या विभागाची मागणी सर्वात जास्त असेल त्या विभागाचे सचिव किंवा प्रतिनिधी | - सदस्य |
| ८) व ९) तज्ञसमितीपैकी ३ सदस्य | - अशासकीय सदस्य |
| १०) संचालक,माहिती व तंत्रज्ञान | - सदस्य सचिव |

२) तज्ञ समितीचे सदस्यांना शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीओएम-१०९१/प्र.क्र.५१/९८/३९ दि.२० मार्च,१९९९ अन्वये सेवाशुल्क देय राहतील.

३) उपरोक्त खरेदी समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :--

अ) संगणक,सर्व्हर,प्रिंटर,मोडेम, इत्यादी विविध प्रकारच्या सामुग्रीचा इष्ट निर्देशांक(Optimum Configuration) ठरविणे.

ब) संगणक व तदनुषंगिक बाबींची खरेदी करणे व दरकरार करणे.

क)सर्व शासकीय कार्यालयांकरिता लागणा-या सर्व तयार आज्ञावल्या(Package Software) खरेदी करणे.

ड) ठरविलेल्या कमाल विनिर्देशाव्यतिरिक्त इतर विनिर्देशाच्या हार्डवेअर खरेदीस मान्यता देणे.

४) खाली नमूद केलेल्या बाबींकरिता कमाल विनिर्देश/खरेदी/दरकरार उपरोक्त समिती निश्चित करील.

| | |
|---|---|
| १) सर्व्हर | २) संगणक |
| ३) प्रिंटर्स | ४) लॅपटॉप |
| ५) एल.सी.डी.प्रोजेक्टर | ६) मॉडेम |
| ७) यु.पी.एस./CVT | ८) डी.व्ही.डी. |



एच ७३E (५००-७०-०९)३४५ GR-20020422160008080-0102

९)सी.डी.रायटर १०)इतर सब सुट भाग
११)यंत्रणा आज्ञावली(सिस्टीम सॉफ्टवेअर-उदा. ऑफीस २०००,विंडोज २०००/डीबी-२/आयएसएम/अँटी व्हायरस/एसक्युएल सर्व्हर इत्यादी).

५) संगणक व तदनुषंगिक बाबींची खरेदी किंवा दरकरार प्रत्येक तिमाहीमध्ये एकदा करण्यांत यावी जेणेकरुन संगणक हार्डवेअरच्या/सॉफटवेअरच्या सतत कमी होणा-या किंमतीचा शासनास फायदा होऊ शकेल. एखाद्या विशिष्ट प्रकारच्या हार्डवेअरची/सॉफटवेअरची मोठ्या प्रमाणावर मागणी असल्यास त्याची खरेदी तीन महिन्यापेक्षा कमी कालावधीनंतरसुध्दा करण्याची मुभा राहील. करण्यांत आलेला दरकरार,त्याच्या दिनांकापासून एका वेळी सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी अस्तित्वात राहणार नाही हे पहावे.

६) एकाचवेळी बरेच संगणक खरेदी करावयाचे झाल्यास त्याचे दर अस्तित्वात असलेल्या दरकरारातील दरापेक्षा कमी असण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्याचप्रमाणे ठराविक प्रमाणात खरेदी करतांना वितरणपूर्व तपासणीद्वारे दर्जा नियंत्रित करता येतो आणि दरकराराद्वारे खरेदी करतांना हे शक्य होत नाही. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक-विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम दिनांक ११ जुलै,२००१चे परिशिष्ट- वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग १,उपविभाग-२ .अनुक्रमांक २८(अ)नियम क्रमांक ७६ नुसार संगणक खरेदी रुपये १०लाखाच्या मर्यादेत (आवश्यक किरकोळ नागरी बांधकामे,फर्निचर, आणि साफटवेअर पॅकेजसाठी प्रारंभीक स्वामित्वधन धरुन)करण्याची वित्तीय शक्ती प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेली आहे. प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीचा वापर करुन सर्व खरेदी (सध्या रु.१० लाखाच्या मर्यादेत) दरकरारानुसार, खालील परि.क्र.७ व ८येथील अटींच्या अधीन राहून, करण्यात यावी. रु.१० लाखापेक्षा जास्त खरेदी करावयाची असल्यास विभागाने शक्य तो माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाकडे आपली मागणी नोंदवावी व खरेदी समितीने पुढील खरेदीच्यावेळी अशा नोंदविण्यात आलेल्या सर्व मागण्या एकत्र करुन एकाच वेळी खरेदीचा दर ठरवावा. खरेदी समितीद्वारे हा दर ठरल्यानंतर विभागाने परस्पर खरेदी आदेश निर्गमित करावे व पुढील कार्यवाही करावी. वितरणपूर्व तपासणी माहिती व तंत्रज्ञान संचालनालय,मंत्रालय,मुंबई यांचेमार्फत करण्यात येईल या अटीचा समावेश खरेदीच्या आदेशामध्ये करण्यात यावा.

७) सर्व विभागांनी समितीने ठरवून दिलेल्या स्टॅंडर्ड कॉनफिगरेशनपैकी साहित्य आपल्या आवश्यकतेनुसार निवड करुन खरेदी करावी. त्या व्यतिरिक्त अन्य संगणक खरेदी करावयाचे झाल्यास सदर समितीची पूर्व परवानगी घेतल्याशिवाय करु नये.

८) सर्व शासकीय कार्यालयासाठी लागणारी सर्व प्रकारच्या तयार आज्ञावल्या(पॅकेज सॉफटवेअर) उदा. ऑफिस -२००० विंडोज/ डी.बी.२/ आय.एस.एम./अँटी व्हायरस/SQL इत्यादि या समितीमार्फत खरेदी करण्यात यावी. विभागानी/कार्यालयांनी आज्ञावल्यांची थेट खरेदी करु नये.



एलएफ-०२६ (५००-१०-०१)२ GR-200204221610080000-0104

९) हे आदेश सर्व शासकीय कार्यालये व जिल्हा परिषदांना लागू होतील. शासनाचे सार्वजनिक उपक्रम व महानगरपालिका/नगरपालिका यांनीसुध्दा या आदेशानुसार कार्यवाही करणे अपेक्षित आहे. हे आदेश कोणत्याही तरतूदीमधून (योजनांतर्गत/योजनेतर/केंद्रीय सहाय्य)प्रस्तावित खरेदीकरिता लागू राहतील.

१०) संदर्भाधीन शासन निर्णयाचे अधिक्रमण करुन हा शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभाग यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ११५५/२००१/व्यय-४, दिनांक १८.१०.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(नितिन गद्रे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-१,मुंबई
महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र,नागपूर,
प्रधान महालेखापाल-१(लेखा परीक्षा)महाराष्ट्र-१,मुंबई
महालेखापाल-२(लेखा परीक्षा) महाराष्ट्र,नागपूर,,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/लेखा कोष भवन वांद्रे(पू.),मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
विकास आयुक्त,उद्योग,उर्जा व कामगार विभाग,
श्री.जे.एस.साहनी,सचिव,वित्त विभाग,
महासंचालक,राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र,मुंबई
नियोजन विभाग/वित्त विभाग
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती(२ प्रती)

GR-200204221610080000-019